उद्योग अधिकारी (प्रशासन), गट-ब (वेतनस्तर एस-१५, रु.४१८००-१३२३००) या पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांकः क्र.पदोन्न-२०२४/प्र.क्र.१०१/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २९ ऑगस्ट, २०२४

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: दिव्यांग-२०२२/प्र.क्र.८३/१६-अ, दि.२०.०४.२०२३
३) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र. एसआरव्ही २०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि.१४.०७.२०२१
४) उद्योग संचालनालयाचे पत्र:उसं /आस्था /पसबै /उ.अ.(प्र) /२०२४ /अे-६५४, दि.१०.०७.२०२४

**शासन आदेश-**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील अधिक्षक, गट-क संवर्गातील सेवाजेष्ठतेनुसार खालील नमूद कर्मचाऱ्यास उद्योग अधिकारी (प्रशासन),गट-ब (वेतनस्तर एस-१५, रु. ४१८००-१३२३००) या पदावर सन २०२३-२४ या निवडसूची वर्षाकरीता तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच संबंधित अधिका-यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या पदावर त्यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नाव | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | ०७ | श्री. वि.अ.घुले | विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर |

२. वरील अधिकाऱ्यांस पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहुन तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

१) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित

सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत उपरोक्त क्र. १ येथील दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहुन सदर सहमती देण्यात येत आहे.

२) सदर उद्योग अधिकारी (प्रशासन),गट-ब पदावरील पदोन्नती उक्त अधिका-यांस त्यांच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील व पदोन्नतीसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) पदोन्नती कोट्यातील पदावर देण्यात येत असलेली सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची असून ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसंदर्भात या विभागाच्या दि.१२.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उपरोक्त अधिकाऱ्यांना विकास आयुक्त (उद्योग) यांनी विहीत मुदतीत कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाल्याचा अहवाल संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांनी उद्योग संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनाधिकृतपणे रजेवर जाऊ नये. पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०१५ मधील २ (ड) येथील तरतुदीनुसार आणि उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील नमूद अधिसूचनेतील नियम क्र. १३ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रूजू होणे आवश्यक राहील सदर मुदतीत रुजू न

झाल्यास संबंधित अधिकाऱ्यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदीन (dies non) म्हणून गणला जाईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२९१०४१५१७०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2024.08.29 10:57:17 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (उद्योग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (उद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई .
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),१/२,महाराष्ट्र ,मुंबई/नागपूर.
५. उद्योग सहसंचालक (आस्थापना),उद्योग संचालनालय,मुंबई
६. उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय, छ.संभाजीनगर/ नाशिक
७. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर.
९. श्री. वि.अ.घुले,उद्योग अधिकारी (प्रशासन) (द्वारा उद्योग संचालनालय,मुंबई )
१०. निवडनस्ती (उद्योग-३)